**सातारा सैनिकी शाळेला सन २०१७-१८ ते सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या अंदाजपत्रकीय तूटीच्या पूर्ततेसाठी अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासैशा-२०२१/प्र.क्र.१३५/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक : ११ जानेवारी, २०२२

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र. १३५/एसएम-६, दिनांक १८.१०.२०२१
४) प्राचार्य,सातारा सैनिक स्कूल यांचे पत्र क्र.१४८/एस/ए/२१-२२/५२९,दिनांक १६.११.२०२१

**प्रस्तावना -:**

सन २०१७-१८ ते सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता आलेली अंदाजपत्रकीय तूट भरुन काढण्यासाठी सातारा सैनिक शाळेला रु. ६,२४,९४,८१९/- इतके अनुदान देय आहे. यापैकी संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये रु. ६५,००,०००/- इतके अनुदान वितरीत केले असून उर्वरीत रु.५,५९,९४,८१९/- इतका निधी वितरीत करण्याची मागणी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये केलेली आहे. या अनुषंगाने वित्त विभागास प्रस्ताव मान्यतेकरिता सादर केला असता, वित्त विभागाने उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १००% म्हणजेच रु. ३,२५,१४,०००/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. तथापि, २२०२०४६९ या लेखाशिर्षाखाली रु. २,६९,९१,९५२/- इतकाच निधी सद्य:स्थितीत शिल्लक आहे. सातारा सैनिकी शाळेस अंदाजपत्रकीय तूट या प्रयोजनार्थ उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सातारा सैनिक शाळेला सन २०१७-१८ ते सन २०१९-२० या वर्षाकरिता आलेली अंदाजपत्रकीय तूट भरुन काढण्यासाठी रु. २,६९,९१,९५२/- (रुपये दोन कोटी एकोणसत्तर लाख ऐक्याण्णव हजार नऊशे बावण्ण फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ मध्ये नमूद आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११२७/२०२१/व्यय-५, दिनांक १७.१२.२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११११७२६१५४९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, pseudonym=E35BA5D62C616DF09A6E5F18BA56B6A77488324E, serialNumber=A738D4711DEB1F586DD1811780BA863704A1EA496FF9EC7D1B6A62B204AB4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2022.01.11 17:27:03 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
९. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सातारा.
१०.महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
११.प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१३.वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१४.प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१५.सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१६.मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१७.वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (एसएम-६).